सन २०२१-२२ करिता कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस, ऊस) अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा ₹१६.४३ लाख निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसु-२०२२/प्र.क्र.०५/४-अे.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ:-

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण/२०१७-प्र.क्र.३१/१७-अे, दि .१९/०४/२०१७.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि.१४/०६/२०२१
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसु-२०२१/प्र.क्र.३९/४-अे, दि.२२/०६/२०२१
५. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०२० –CU-IV दि. ०५/०१/२०२२
६. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.विप्र३/रा.अ.सु.अ.कापूस/अनु./६२०/२२, दि.०६/०१/२०२२
७. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्यासन ६, दि.२३/०२/२०२२

प्रस्तावना :-

सन २०२१-२२ करीता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) रु.७३९.०० लाख निधीच्या कृती आराखडयास (केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० प्रमाणात) केंद्र शासनाच्या संदर्भांकित दि.१४/०६/२०२१ च्या पत्रान्वये दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने सदर कृती आराखडयास संदर्भांकित दि.२२/०६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

सन २०२१-२२ करिता केंद्र शासनाने तीन्ही प्रवर्गाकरीता अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस ,ऊस) पहिल्या हप्त्यापोटी तिन्ही प्रवर्गाकरीता एकूण केंद्र हिस्याचा ₹ ११०.७५ लाख निधी दि.०५/०१/२०२२ रोजी पिकनिहाय वितरीत केलेला आहे. तसेच राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस ,ऊस) निधी वितरण प्रक्रिया व निधी देखरेखीकरिता

PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार केंद्र शासनाकडून राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिके (कापूस ,ऊस) योजना SNA मार्क करण्यात आली आहे. त्यानुषंगाने कृषि आयुक्तालयाच्या मागणीप्रमाणे अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता या अभियानातंर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस ,ऊस) प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा ₹ **९.८६ लाख** व राज्य हिस्याचा ₹ **६.५७ लाख** असा एकूण ₹ **१६.४३ लाख** निधी, वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०२१-२२ करिता राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरिता (कापूस , ऊस) **अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण ₹ १६.४३ लाख निधी (रुपये सोळा लाख त्रेचाळीस हजार फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचे पीक निहाय तसेच केंद्र व राज्य हिस्स्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

**(₹ लाख)**

| अ. क्र. | राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत वाणिज्यिक पिके | अनुसूचित जमाती प्रवर्ग | | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १. | कापूस | ६.२३ | ४.१५ | १०.३८ |
| २. | ऊस | ३.६३ | २.४२ | ६.०५ |
| | **एकूण एकंदर** | **९.८६** | **६.५७** | **१६.४३** |

२. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **कापूस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹६.२३ लाख निधी (रुपये सहा लाख तेवीस हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹४.१५ लाख निधी ( रुपये चार लाख पंधरा हजार फक्त) असा एकूण रु.१०.३८ लक्ष निधी ( रुपये दहा लाख अडोतीस हजार फक्त) वितरीत करण्यात येत आहे .

३. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **ऊस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹ ३.६३ लाख निधी (रुपये तीन लाख त्रेसष्ट हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ २.४२ लाख निधी ( रुपये दोन लाख बेचाळीस हजार फक्त ) असा एकूण ₹ ६.०५ लाख निधी ( रुपये सहा लाख पाच हजार फक्त ) वितरीत करण्यात येत आहे.

४. परिच्छेद क्र. १ ते ३ मध्ये नमूद केल्यानुसार, कापूस, ऊस या पिकांकरिता वितरीत केलेला अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी सन २०२१-२२ मध्ये पुढील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा:-

| केंद्र/राज्य हिस्सा | लेखशिर्ष<br>अनुसूचित जमाती प्रवर्ग | |
|---|---|---|
| | कापूस | ऊस |
| केंद्र हिस्सा | मागणी क्रमांक ,टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२३) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (कापूस) (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५७५)<br>(कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक, टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (ऊस) (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५९३) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |
| राज्य हिस्सा | मागणी क्रमांक, टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२४) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके (कापूस) (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A५८४)<br>(कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक, एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (ऊस) (केंद्र पुरस्कृत योजना)(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A६०१) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |

५. सन २०२१-२२ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व संनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी खालीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|
| आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि),<br>कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |

६. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानाकरीता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹१६.४३ लाख निधी करिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर जिल्हा निहाय खर्चाची मर्यादा निश्चित करावी.

७. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. सदर उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे प्रधान सचिव (कृषि) यांच्या स्वाक्षरीने सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास निर्गमित करण्यात येईल.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४/१०/२०२१ व अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०३/०२/२०२२ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे .

१०.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२५१७३४२३२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.02.25 17:36:58 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. प्रधान सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१२.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३.सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१४.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१५.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१६.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
२०.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२१.निवड नस्ती-४अे.